शेक्सपिअरपासुन आतापर्यंत
कित्येकांनी कित्येक पानं लिहलीय
ह्या अडिच शब्दावर

तरीही अपुरी..

जो शब्दात मावत नाही..
पण
लिहल्यावाचुन रहावत नाही..
नेटाक्षरी  अशा शब्दावर..



# नेटाक्षरी

ई-साहित्य प्रतिष्ठान
वर्ष तिसरे, अंक ७
१४ फेब्रुवारी २०११




संपादक

भारती सरमळकर (मुंबई)

सह संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)


उरले उरात काही आवाज चांदण्यांचे......
नेटाक्षरी सोबत
प्रेमाचे हे अबोल क्षण बोलके करुयात
काही अजरामर
कविता व गीतांनी
प्रेम दिनाच्या सर्व रसिक वाचकांना शुभेच्छा!!!!!
GoooDDay.com

असे तुझ्याशी बोलावे हे
ठरवुनी आलो मनात काही
आणिक तुझिया नेत्री दिसले
बोलायाचे तसे तुलाही

असा कसा मग मुकाच झालो
चर्चा केली नको नको ती
हास्याच्या उठल्या लहरी, पण
मनात लपले मनचे मोती

एक आवंढा गिळून तुही
गिळले जे थरथरले ओठी
ओठ दाबिला उठवित नाजूक
भुवयांवर बारिकशी आठी

त्या आठीच्या रेघेवर पण
सही ठोकली मम नशिबाने
असा कसा मग मुकाच झालो
मुकी जाहलीस तुही कशाने ?

या जन्माला फुटे न भाषा
निदान पुढच्या फुटेल का ती ?
ज्योतीत तुझ्या जळल्यावाचून
मातीला नच मिळेल माती



**विंदा करंदीकर**

लाजून हासणे अन हासून ते पहाणे
मी ओळखून आहे सारे तुझे बहाणे

डोळयास पापण्यांचा का सांग भार व्हावा?
मिटताच पापण्या अन का चंद्र ही दिसावा?
हे प्रश्न जीवघेणे हरती जिथे शहाणे

हाती धनुष्य ज्याच्या, त्याला कसे कळावे
ह्रदयात बाण ज्याच्या, त्यालाच दुःख ठावे
तिरपा कटाक्ष भोळा, आम्ही इथे दिवाणे

जाता समोरूनी तू, उगवे टपोर तारा
देशातुनी फुलांच्या आणी सुगंध वारा
रात्रीस चांदण्यांचे, सुचते सुरेल गाणे

**मंगेश पाडगावकर**



मी नजरेला, खास नेमले गस्त घालण्यासाठी
तुला वाटते, ती भिरभिरते तुला पाहण्यासाठी

म्हणून तू, जाहलीस माझी, माझी, केवळ माझी
किती बहाणे, केले होते, तुला टाळण्यासाठी

घडीभराने, मलूल होतो, गजरा वेणीमधला
खरे सांगतो, खरेच घे हे, हृदय माळण्यासाठी

गुपचुप येऊन भेटत असते, तुझी आठवण मजला
तिचा दिलासा, मला पुरेसा, आहे जगण्यासाठी

कधी कवडसा, बनून यावे, तुझ्या घरी एकांती
उघडझाप करशील मुठीची, मला पकडण्यासाठी

तू म्हणजे गं, फूल उमलते, गंध तुझा मी व्हावे
दवबिंदू, व्हावेसे वाटे, तुला स्पर्शिण्यासाठी

तुझी साधना, करता करता, अखेर साधू झालो
निर्मोही, जाहला 'इलाही' , तुला मिळविण्यासाठी



**इलाही जमादार**

नाही म्हणायाला आता असे करुया
प्राणात चंद्र ठेऊ, हाती उन्हे धरुया

आता परस्परांची चाहुल घेत राहू
आता परस्परांच्या स्वप्नात वावरुया

नेले जरी घराला वाहुन पावसाने
डोळ्यातल्या घनांना हासून आवरुया

गेला जरी फुलांचा हंगाम दुरदेशी
आयुष्य राहिलेले जाळून मोहरुया

ऐकू नकोस काही त्या दुरच्या दिव्यांचे
माझ्या तुझ्या मिठीने ही रात्र मंतरुया

हे स्पर्श रेशमी अन हे श्वास रेशमाचे
ये! आज रेशमाने रेशीम कातरुया

**सुरेश भट**



## किती झाले ?

रात्री बायकोबरोबर गाडीवरुन घरी जाताना
ती खोडकर आवाजात सांगू लागते
आमच्याच घरच्या खाणाखुणा...

‘हां आता इथुन डावीकडे... आता सरळ
त्या मारुतीपासुन उजवीकडे वळा...
थोडी पुढे घ्या अजुन... पांढ-या गेटपाशी थांबवा
हां ... बास बास .. इथेच ..’

आणि मग उतरत, पर्स काढत
विचारते हसत हसत ‘हं किती झाले ?’

८४ लक्ष तर झाले असतीलच की प्रिये ?
हा तरी शेवटचा की नव्या जन्मवर्तुळाचा हा प्रारंभ ठाऊक नाही !
गतजन्मांचे आठवत नसेलही काही आपल्याला
पण तेंव्हाही असतील असेच तुझे जन्मप्रामाणिक हसरे क्षण
आणि माझे अंतःस्थ उदासिन प्रश्न काही !!

आता पर्स काढलीच आहेस तर ठेव हातावर
एखादी साखरहळवी टॉफ़ी...
गोड चवीने सरु दे अजून एक रात्र
अंधारातच चढायचा आहे एक एक जिना
हातात हात तेवढा राहू दे फ़क्त



**संदिप खरे**

तव नयनांचे दल हलले गं !
पानावरच्या दंवबिंदूपरि
त्रिभुवन हे डळमळले गं !

तारे गळले, वारे ढळले
दिग्गज पंचाननसे वळले
गिरि ढासळले, सुर कोसळले
ऋषि, मुनि,योगी चळले गं !

ऋतुचक्राचे आस उडाले
आभाळातुनि शब्द निघाले
“आवर आवर आपुले भाले
मीन जळी तळमळले गं !

हृदयी माझ्या चकमक झडली
नजर तुझी धरणीला जडली
दो हृदयांची किमया घडली
पुनरपि जग सावरले गं !



**बा. भ. बोरकर**

ती पाहताच बाला, कलिजा खलास झाला
छातीत इष्क-भाला, की आरपार गेला

स्वर्गातल्या पक्ष्यांना की वस्रगाळ करुनी
कमनीय देह विधिने, रचिला तिचा छबेला



लावण्य काय सारे, उकळोनि वा पिळोनी
त्या मस्त अत्तराचा, भरला गमेचि बुधला

डौलात चालता ती, हत्ती वनात झुरती
रस्त्यात गुंड जमती, तिज अन पहावयाला

**प्रल्हाद केशव अत्रे**

तोः सहज चालतेस तू, तेच नृत्य होतसे
सहज बोलतेस तू, तेच भावगीतसे
सहज स्पर्शताच तू, हर्ष होई अंतरा
दुरावताच तू जरा, जीव होई बावरा
संगतीत दिवस तुझ्या धुंद चांदरातसे

तीः बोलु काय यावरी, मी मुकीच राहते
मनास तृप्ती होईतो, तुझ्याकडेच पाहते
बोलणे तुझे सख्या, सुखद मलयवातसे
संगतीत दिवस तुझ्या धुंद चांदरातसे

दोघेः मला न साध्य बोलणे, तुलाही नाही साधले
अतूट प्रेमरज्जुनी, जीव दोन बांधले
प्रणयधुंद युगुल एक, सुधारसात न्हातसे
संगतीत दिवस तुझ्या धुंद चांदरातसे

**ग.दि.माडगूळकर**



तू तेव्हा तशी, तू तेव्हा अशी,
तू बहरांच्या बाहूंची

तू ऐल राधा, तू पल संध्या
चाफेकळी प्रेमाची

तू काही पाने, तू काही दाणे,
तू अनोळखी फुलांची

तू नवीजुनी, तू कधी कुणी
खारीच्या गं, डोळयांची

तू हिर्वी-कच्ची, तू पोक्त सच्ची,
तू खट्टी-मिट्ठी ओठांची

तू कुणी पक्षी : पिसांवर नक्षी
कवितेच्या ईश्वराची

**आरती प्रभू**



पत्र लिहि पण नकॊ पाठवू शाई मधुनी काजळ गहिरे
लिपीरेशांच्या जाळीमधुनी नकॊ पाठवू हसू लाजरे

चढ़ण लाडकी भूवई मधली नको पाठवू वेलांटीतून
नकॊ पाठवू तीळ गालीचा पूर्णविरामाच्या बिंदूतून

शब्दामधुनी नकॊ पाठवू अक्षरामधले अधीरे स्पंदन
नकॊ पाठवू कागदातूनी स्पर्शामधला कंप विलक्षण

नकॊ पाठवू वीज सुवासिक उलगडणारी घडीघडीतून
नको पाठवू असे कितीदा सांगितले मी, तू हट्टी पण !

पाठवीशी ते सगळे सगळे पहील्या ऒळीमध्येच मिळते
पत्र त्या नंतरचे मग वाचायाचे राहून जाते

**इंदिरा संत**



माझे मन तुझे झाले
तुझे मन माझे झाले
माझे प्राण तुझे प्राण
उरले ना वेगळाले

मला लागे तुझी आस
तुला जडे माझा ध्यास
तुला मला चोहीकडे
माझे तुझे होती भास

माझ्यातून तू वाहसी
तुझ्यातही मी पाहसी
तुझ्यामाझ्यातले सारे
गुज माझ्यातुझ्यापाशी

तुझी माझी पटे खूण
तुझी माझी हीच धून
तुझे प्राण माझे प्राण
माझे मन तुझे मन

**सुधीर मोघे**



महासागराचं चरित्र
मला माहीत आहे
माहीत आहे त्याची महतीही
पण मी राहतो आहे
फुलाच्या पाकळीवर
अवकाशातून उतरलेल्या
दहीवराच्या
एका लहानशा थेंबामध्ये
मला माहीत आहे हे ही
की जगातील सा-या थेंबांवर
अंतिम मालकी आहे
महासागराची
आणि तरीही माझी बांधिलकी
पृथ्वीला वेढणा-या
त्या सीमाहीन महातत्वाशी नाही
ती आहे-
माझ्या अस्तित्वाने ओथंबलेल्या
स्फटिकाच्या या थेंबाशी
कारण माझी बांधिलकी
ज्ञानाची नाही
आहे फक्त
प्रेमाची



**कुसुमाग्रज**

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने मागल्याच आठवड्यात नाबाद ८५चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

---

ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

प्रसिध्द झालेली ई-पुस्तके

टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण,
तॊ आणि ती, प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान-3D, ई-शाळा,
तॊ, मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गॊष्टी, मीरा अनुवाद, ऒथंब,
सावळ्या मुलीची गाणी, सईची वही

---

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**esahity@gmail.com**

**नेटाक्षरीचा** हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**netaksharee@gmail.com**

## आता ई-साहित्यची वरील सर्व ई-प्रकाशन उपलब्ध आहेत सी डी मध्ये

**संपर्क करा ९८६९६७४८२०**

**www.esahity.com**